राज्यातील पोलीसांना कौटुंबिक आरोग्य
योजना लागू करणे तसेच विहित
शारीरिक क्षमता बाळगणाऱ्या पोलीस
अधिकारी/कर्मचाऱ्यांना प्रोत्साहन भत्ता
देण्याबाबत गठीत करावयाची समिती.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
शासन निर्णय क्र.पीडब्ल्यूएफ-१२०४/१४३/प्र.क्र.२/पोल-७,
मंत्रालय,मुंबई, दिनांक १२ जुलै,२००५

**प्रस्तावना:-** राज्यांतील पोलीस अधिकारी/कर्मचारी यांची संख्या सुमारे १,५३,०००/- इतकी असून त्यांना व त्यांच्या कुटुंबियांच्या वैद्यकीय खर्चाची प्रतिपूर्ती करण्यांसाठी बराच कालावधी लागत असल्यामुळे बरेच पोलीस अधिकारी/ कर्मचारी वैद्यकिय खर्चाच्या प्रतीपूर्तीसाठी मागणी करीत नाहीत. तसेच त्यांना उत्तम प्रतीच्या खाजगी रुग्णांलयामधून वैद्यकिय सुविधा घेता येत नाहीत असे आढळून आले आहे. काही तातडीचे प्रकरणी त्यांना वैद्यकिय सेवा सुविधा खाजगी रुग्णांलयातून त्वरित घेण्यांसाठी आर्थिक खर्च स्वतःच करावा लागतो. त्यामुळे त्यांचा परिणाम त्यांच्या शारीरिक कार्यक्षमतेवर व मनावर होतो. पोलीसांची शारीरिक क्षमता चांगली राहण्यांसाठी व काहीही रोख रक्कम न भरता त्यांना खाजगी रुग्णांलयात त्वरित आरोग्य सुविधा मिळण्यांसाठी "कौटुंबिक आरोग्य योजना" महाराष्ट्र राज्यातील पोलीसांना लागू करण्यांची बाब शासनाच्या विचाराधीन होती. तसेच राज्यातील पोलीस अधिकारी/ कर्मचारी यांच्यावर सध्याच्या कामाच्या भारामुळे व धावपळीमुळे त्यांचे आरोग्य चांगले ठेवण्यांस कमी वेळ मिळतो. विशेषतः ही बाब मोठया शहराच्या ठिकाणी प्रकर्षाने जाणवते अशाही परिस्थितीमध्ये बरेच पोलीस अधिकारी/कर्मचारी आपले आरोग्य व शारीरिक क्षमता उत्तम ठेवून कार्यक्षमता अबाधित ठेवतात. पोलीस दल नेहमी सक्षम राहण्यासाठी विहित शारीरिक क्षमता बाळगणाऱ्या पोलीस अधिकारी/कर्मचाऱ्यांना उत्तेजन देण्याच्या दृष्टीने आर्थिक प्रोत्साहन भत्ता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-** या प्रश्नांचा सर्वांगीण विचार करुन शासनाने राज्यांतील पोलीसांना व त्यांच्या कुंदुबियांना उत्तम प्रतीच्या खाजगी रुग्णांलयातून वैद्यकिय सेवा सुविधा घेण्यासाठी कौटुंबिक आरोग्य योजना लागू करण्यांस तत्त्वतः मान्यता दिली आहे. तसेच विहित शारीरिक क्षमता बाळगणाऱ्या पोलीस अधिकारी/कर्मचारी यांना प्रोत्साहन भत्ता देण्यांबाबत शासनाने तत्त्वतः मान्यता दिली आहे.

२. कौटुंबिक आरोग्य योजनेची अंमलबजावणी करण्यांबाबत व विहित शारीरिक क्षमता बाळगणाऱ्या पोलीसांना प्रोत्साहन भत्ता देण्यांबाबत कार्यपध्दती ठरविण्यांसाठी पुढीलप्रमाणे समिती गठीत करण्यांत येत आहे.

| अ.क्र | पदनाम | समितीतील स्थान |
|---|---|---|
| १ | अपर मुख्य सचिव (गृह) | अध्यक्ष |
| २ | प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग,मंत्रालय,मुंबई. | सदस्य |
| ३ | पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई. | -"- |

| | | |
|---|---|---|
| ४ | पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई | -"- |
| ५ | महासंचालक, आरोग्य सेवा,महाराष्ट्र राज्य,मुंबई. | -"- |
| ६ | व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्यादित,वरळी,मुंबई. | -"- |
| ७ | पोलीस उप महानिरीक्षक (प्रशासन),महाराष्ट्र राज्य,मुंबई. | सदस्य सचिव |

३. वरीलप्रमाणे गठीत करण्यांत आलेल्या समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे आहे.

१) पोलीसांच्या कुटुंबासाठी राबविण्यांत येणाऱ्या आरोग्य योजनेचा लाभ घेण्यासाठी तसेच प्रोत्साहन भत्ता देण्यासाठी पात्रता निकष ठरविणे.

२) पोलीसांच्या कुटुंबाकरीता राबविण्यांत येणाऱ्या कौटुंबिक आरोग्य योजनेची अंमलबजावणी करण्यांसाठी कार्यपध्दती ठरविणे.

३) पोलीसांना द्यावयाचा प्रोत्साहन भत्त देण्यांसाठी कार्यपध्दती ठरविणे.

४) योजनेअंतर्गत चुकीची माहिती सादर करुन लाभ घेतल्याचे निदर्शनास आल्यास, त्या विरुध्द करावयाच्या उपाययोजनाबाबत शासनास शिफारस करणे.

५) वरील योजना राबविण्यांसाठी इतर आवश्यक अशा शिफारशी करणे.

६) वरील अनुषंगाने समिती गठीत केल्याच्या दिनांकापासून १५ दिवसांत त्यांच्या शिफारशीसह शासनास अहवाल सादर करणे.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाची अनौपचारिक संदर्भ क्र.३६६/०४/व्यय-७, दिनांक ६.७.२००४ अन्वये मान्यता घेऊन निर्गमित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(अ. ने. नाईकनवरे )
उप सचिव, गृह विभाग,महाराष्ट्र शासन

प्रति,

अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग,मंत्रालय,मुंबई.
प्रधान सचिव (विशेष),गृह विभाग,मंत्रालय,मुंबई.
पोलीस महासंचालक,महाराष्ट्र राज्य,मुंबई.
पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई.
महासंचालक,आरोग्य सेवा,महाराष्ट्र राज्य,मुंबई.
व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य पोलीस गृहमिर्नाण व कल्याण महामंडळ मर्यादित,वरळी,मुंबई.
पोलीस उपमहानिरीक्षक (प्रशासन),महाराष्ट्र राज्य,मुंबई.
उप सचिव (पोल-७),गृह विभाग,मंत्रालय,मुंबई.
निवड नस्ती (पोल-७),गृह विभाग,मंत्रालय,मुंबई.

******